अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय पशुधन अभियानांतर्गत पशुधन विमा योजना सन २०२१-२२ मधील निधी वितरण.
(केंद्र हिस्सा - २४०३ ई १२८)
(राज्य हिस्सा - २४०३ ई १३७)
(केंद्र हिस्सा - २४०३ ई १४६)
(राज्य हिस्सा - २४०३ ई १५५)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/प्र.क्र. ७ /कार्यासन ६**
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ३१ मार्च, २०२२.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१, दि.०३.०२.२०२२ व दि.१७.०३.२०२२.
२) केंद्र शासन, कृषी मंत्रालय यांचे पत्र क्र.F.No.R.99011 (11)/1/2020-NLM-DADF, Dt.01.02.2021.
३) कृषी व पदुम विभागाची नस्ती क्र.पुरक-२०२२/प्र.क्र.१७/पदुम-४.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत कृषी व पदुम विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय पशुधन अभियानांतर्गत पशुधन विमा योजनेसाठी केंद्र हिस्सा रु.६१.२० लाख व समरुप राज्य हिश्श्याकरीता रु.४५.४५ लाख इतका संदर्भाधीन क्र.४ अन्वये सादर निधी वितरण प्रस्तावास वित्त विभागाने सहमती दिलेली आहे. वित्त विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्र.टी-५ याखाली मुख्य लेखाशीर्ष २४०३, पशुसंवर्धन, केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय पशुधन अभियानांतर्गत पशुधन विमा योजनेसाठी केंद्र हिस्सा रु.६१.२० लाख व समरुप राज्य हिश्श्याकरीता रु.४५.४५ लाख असा एकूण रु.१०६.६५ लाख इतका निधी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदींतून खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु.लाखात)

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष व केंद्र / राज्य हिस्सा | बाब | सन २०२१-२२ मधील सुधारीत अंदाज | सदर शा.नि. अन्वये वित रीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| राष्ट्रीय पशुधन अभियानांतर्गत पशुधन विमा योजना **(गडचिरोली जिल्हयाकरीता)** | २४०३ ई १२८ (केंद्र हिस्सा ५० टक्के) | ३३, अर्थसहाय्य | ३.०० | ३.०० |
| | २४०३ ई १३७ (राज्य हिस्सा ३० टक्के) | | १.८० | १.८० |
| राष्ट्रीय पशुधन अभियानांतर्गत पशुधन विमा योजना **(गडचिरोली जिल्हा वगळून)** | २४०३ ई १४६ (केंद्र हिस्सा ४० टक्के) | ३३, अर्थसहाय्य | ५८.२० | ५८.२० |
| | २४०३ ई १५५ (राज्य हिस्सा ३० टक्के) | | ४३.६५ | ४३.६५ |
| **एकूण** | | | **१०६.६५** | **१०६.६५** |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.१०६.६५ लाख (अक्षरी रुपये एक कोटी सहा लाख पासष्ट हजार फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून सचिव, कृषी विभाग यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ च्या शासन आदेशातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी व निधी उपयोगिता प्रमाणपत्रासह पुढील निधी वितरणासाठी प्रस्ताव सादर करावा.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

६. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतून आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात तथापि, आदिवासी उपयोजना बाहय क्षेत्रात मात्र वैयक्तिक लाभाच्याच योजना घेण्यात याव्यात.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.४२४/व्यय-१४, दि.३०.०३.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३११६३५१६२०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.04.04 12:40:44 +05'30'

**(रविंद्र दि. औटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, पशुसंवर्धन आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११.निवड नस्ती (का-६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.